जकात कर रद्द करणे आणि त्याऐवजी पर्यायी महसूलीचे साधन शोधून काढणे या प्रयोजनाकरिता नियुक्त केलेल्या समितीचा अहवाल सादर करण्यास मुदत वाढ देण्याबाबत.......

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक-संकीर्ण-१०९१/प्र.क्र. ३४/कराधान-१.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- २२ नोव्हेंबर १९९३.

वाचा:- १] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:-संकीर्ण-१०९१/प्र.क्र. ३४/कराधान-१, दिनांक ७.६.१९९३.

२] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:-संकीर्ण-१०९१/प्र.क्र. ३४/कराधान-१, दिनांक ४ सप्टेंबर, १९९३.

प्रस्तावना :- जकात कर रद्द करून त्याऐवजी पर्यायी महसूलीचे साधन शोधून काढण्यासाठी शासनाने नियुक्त केलेल्या जकात कर विषयक समितीला त्यांचा अहवाल सादर करण्यासाठी विहित केलेला ३ महिन्याचा कालावधी दिनांक ३१ ऑक्टोबर, १९९३ पर्यंत वाढवून देण्यात आला होता. तथापि राज्यातील भूकंपग्रस्तांच्या सहाय्यासाठी करावयाच्या निरनिराळ्या उपाययोजनांच्या संदर्भात समितीचे अध्यक्ष व इतर संबंधित अधिकारी हे कार्यरत असल्यामुळे समितीच्या पुढील बैठका घेऊन अहवाल तयार करण्याचे कार्य विहित कालावधीत होऊ शकले नाही. तदनुसार अहवाल सादर करण्यासाठी आणखी मुदतवाढ देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय:- या संदर्भात काळजीपूर्वक विचार केल्यानंतर शासन असा आदेश देत आहे की, दिनांक ७ जून १९९३ च्या वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-संकीर्ण-१०९१/प्र.क्र. ३४/कराधान-१, अन्वये नियुक्त करण्यात आलेल्या जकात कर विषयक समितीला त्यांचा अहवाल सादर करण्यासाठी विहित केलेला ३ महिन्याचा कालावधी दिनांक ३१ मार्च, १९९४ अखेरपर्यंत वाढविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वि.प्र. कुळकर्णी

[ वि.प्र. कुळकर्णी ]
अवर सचिव, वित्त विभाग.

कृ.मा.प.

प्रत माहितीसाठी सादर अग्रेषित.

१] समितीचे सर्व सदस्य.
२] मा. मुख्य मंत्र्यांचे सचिव.
३] वित्तमंत्री/ वित्त राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.
४] सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५] सचिव [परिवहन], गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६] सचिव [ग्राम विकास] ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७] विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, ८ वा मजला, माझगांव, मुंबई-४०० ०१०.
८] महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९] महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.
१०] महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
११] निवड नस्ती, करधान-१.